


राज्य मराठी विकास संस्था
(महाराष्ट्रशासन पुरस्कृत)
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय,
३, महापालिका मार्ग,
धोबीतलीव, मुंबई – ४००००१
रजि नं. एक १६०९४ (मुंबई)
दूरध्वनी : २२६५३९६६/ फॅक्स : २२६३१३२५
Email rmvs_mumbai@yahoo.com

## निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क्र./ २०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे.

ह्या प्रकल्पांतर्गत उपलब्ध होणारे ग्रंथ व नियतकालिके प्रतिमुद्राधिकार अधिनियमाची मुदत उलटलेले असल्याने सार्वजनिक स्वरूपात उपलब्ध आहेत. ही सामग्री विविध ग्रंथालयांनी जतन करून ठेवल्यामुळेच आज आपल्याला उपलब्ध होत आहे.

सदर पुस्तके अथवा नियतकालिके जशी उपलब्ध होत जातील तसे त्यांचे संगणकीकरण करून जनतेला ती उपलब्ध करून देण्यात येतील. ह्या ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना आपण खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

०१ सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती ह्या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.

०२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.

०३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्थेची मुद्रा आपणास काढता येणार नाही.

०४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी ह्या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून ह्या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. ह्यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था ह्यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

॥ श्री ॥

# काव्येतिहास-संग्रह.

भुजतरुवनच्छायां येषां निषेव्य महौजसां
जलधिरसना मेदिन्यासीदसावकुतोभया
स्मृतिमपि न ते यान्ति क्ष्मापा विना यदनुग्रहम्
प्रकृतिमहते कुर्मस्तस्मै नमः कविकर्मणे ॥

राजतरंगिणी.

पुस्तक ५.  डिसेंबर १८८२.  अंक १२.

हें मासिक पुस्तक
पुणें येथें
ज्ञानप्रकाश छापखान्यांत
छापिलें

किंमत ८ आणे.

अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत

…पका युद्धकांड छापण्यास ह्या अंकांत
दुसरीं तीन कांडेंही आम्हांस मिळालीं आहेत. तर
आणखी प्रती कोणापाशीं असल्यास त्या आमच्याकडे पाठविण्याची कृपा
करावी म्हणजे शुद्ध करण्याच्या कामास मदत होईल. काम झालें म्हणजे ज्यांच्या
त्यांस परत केल्या जातील.

का० सं० व्यवस्थापक.

---

## विषयक्रम.


**बखरी.**

थोरले शाहू महाराज यांचें चरित्र ........ ९३–१००

पत्रें, यादि वगैरे ........ ९३–१००

**मराठी कविता.**

अनेक कवि–श्रीरामदासस्वामिकृत युद्धकांड ........ १७–२४

मुक्तेश्वरकृत मूर्खांचीं लक्षणें–शतमुखरावण वध ........ १४३–१५०

**संस्कृत काव्यें.**

श्रीशंकराचार्यकृतः प्रबोधसुधाकरः ........ ३७–४४

श्रीशिवकाव्यम्– ........ ८५–९२


अनुक्रमणिका


राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत

# विषयक्रम.

बखरी.

धावडशी येथील ब्रह्मेंद्र स्वामींचे चरित्र .... ९–१६
पत्रें, यादी वगैरे........................... ३३–४०

मराठी-कविता.

मोरोपंतकृत–विष्णुपद वकीली, भस्मासुर आ-
ख्यान, साधुरीति ........................ ११३–१२०
वामनपंडितकृत–भीष्मशरपंजर, राधाविलास. १४७–१५४

संस्कृतकाव्यें.

हेतुरामायणम् ........................... ७–१४
वामनकृतोऽनुभूतिलेशः ............... २१–२४
सदाशिवकविविरचितं स्फुटश्लोकप्रकरणम् १–४

अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत

पंताचें चिमणाजीपंताचें नातेंही श्रीस्वामींस समजलें. व चिमणाजीपंताची केवळ गरिबीची वृत्ति ध्यानांत आली. तदनंतर स्वामींनीं देवळाचें काम लाविलें होतें, तेव्हां चुन्याची तर्तुद पाहतां कोणी स्वामीस सांगितलें कीं, कोणी [?] महिपतिगडीं शिवाजी महाराज यांचे कारकिर्दीच्या चुन्याच्या भट्या आहेत. व खड्यांचे मोटमोठे ढीग पडले आहेत. तेथील सुभेदाराचे भेटीस स्वामी गेल्यास चुन्याचे खड्यांचें कार्य होईल. असें कळल्यानंतर स्वामींनीं महिपतगडास जावयास स्वारीची तयारी करून समागमें चिमणाजीपंतास घेतलें. आणखी दोघे वैदिक ब्राह्मण परशुरामकर चितळे वगैरे घेऊन चालिले. सुभेदारास प्रसाद द्यावयासि दोन नारळ स्वामींनीं घेतले ते चिमणाजीपंता जवळ दिले. आणि परशुरामाहून निघाले. मार्गीं चिमणाजीपंत व परशुरामकर ब्राह्मण स्नान केले. दोन प्रहर जहाले. ब्राह्मण क्षुधातुर होऊन चिमणाजीपंतास बोलिले तुह्मां जवळ नारळ आहेत ते भक्षावयासि देणें. गडास गेल्यावर दुसरे घेऊन देऊं. तेव्हां चिमणाजीपंतीं अनमान केलें. "श्रीस्वामी रागें भरतील. त्यांचे आज्ञे शिवाय देतां नये," असें बोलले. परंतु ब्राह्मण क्षुधातुर. "स्वामी मागतील तेव्हां देऊं विषय फार नाहीं" असें बोलून नारळ घेऊन भक्षिले. तदोत्तर गडास जातांच स्वामींनीं चिमणाजीपंताजवळ नारळ मागितले. दुसरा नारळ जवळ नाहीं तेव्हां उगेच राहिले. श्रीस्वामी रागें भरले. नारळ काय केले ह्मणून विचारलें. तेव्हां "मार्गीं ब्राह्मणांनीं भक्षिले दुसरे आणितों" ह्मणून बोलतांच फार कोप केला. "माझे आज्ञेशिवाय नारळ कसे दिले ? तूं माझे उपयोगीं नाहींस. माघारे जाणें." ह्मणून आज्ञा केली. गालीप्रदानें केलीं. तथापि चिमणाजीपंतीं चित्तांत तिळमात्र विषमता न आणून मागती सेवेंत तत्पर राहते झाले. रात्रौ स्वामींनीं निद्रा केल्या नंतर जवळ जाऊन पाय चुरावयासि लागले. स्वामींनीं चिमणाजी पंत असें जाणून लत्ता मारून उठवून लाविलें. आणि निद्रा केली. क्षण एक जाहल्या नंतर मागती येऊन पाय चुरावयासि फिरोन लागले. मागती रागें भरून उठवून लाविले. याप्रमाणें तीन वेळां उठवून लाविले. आणि निद्रा केली. तों पहांटेची प्रहर रात्र राहिली. स्वामींस निद्रा लागली असें पाहून मागती येऊन पाय चुरीत बसले. अरुणोदय-समयीं स्वामी जागृत होऊन पाहतात तों चिमणाजीपंत पादसेवा करीत बसलेआहेत. तेव्हां स्वामी बोलिले, "दोन चार वेळां तुजला रागें भरून, शिवीगाळ करून, लाथा मारून उठवून लाविलें असतां फिरोन येऊन पाय दावीत बसलास?" तेव्हां चिमणाजीपंतीं उत्तर केलें "मायबाप गणगोत स्वामींचे पाय. हे सांडून कोठें जाऊं ? स्वा मी वि ना श्र य कोठें आश्रय नाहीं" असें करुणावचन श्रवण करितांच स्वामींस

अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

फारच कृपा येऊन समाधान केलें, "चिंता न करणें देव तुझें बरें करील." या प्रमाणें बोलून पहिल्या पेक्षां विशेष कृपा करावयासि लागले. समागमें परशुरामकर ब्राह्मण होते त्यांस बोलले "रात्रौ तीन चार वेळ चिमणाजीस रागें भरून घालविला असतां मागती सेवेशीं तत्पर, चित्तांत मळ नाहीं, गरीब आहे." महिपतगडचे सुभेदारानें स्वामींची पूजा करून आज्ञेप्रमाणें चुन्याचें काम केलें. नंतर स्वामी निघोन परशुरामास आले. चिमणाजीपंतास चार रुपये दरमहा करून पोत्याचें काम सांगितलें. बापुजीपंतास पांच रुपये दरमहा करून फडणिशीचें काम सांगितलें. तदनंतर स्वामींनीं धोंडोपंत सप्रे यांची कन्या मागोन चिमणाजीपंताचें लग्न केलें. लिहिणें कारभार दिवसेंदिवस अधिक होत चालिले.

त्याजवर बापूजीपंतास श्रीस्वामी बोलिले कीं, "तूं एकटा; कारखान्याचें लिहिणें व चिटणिसीचें लिहिणें फार पडतें. यास्तव आपले मायेचा फूट न पडे, काम चाले, ऐसा कारकून आणावा." यावरून धोंडो भास्कर तांबे गो रा निकट ह रा मी सरदार कल्याणप्रांतें होता त्या जवळ होते. त्यांस पत्र पाठवून आणून स्वामीस भेटवून चिटणीशीचें काम सांगितलें. आणि पांच रुपये दरमहा केला. बापुजीपंत, चिमणाजीपंत, धोंडोपंत त्रिवर्ग एकरूपें—एक मायेनें श्रीचे सेवेंत तत्पर राहिले. स्वामींनीं शामला कडून पेढेंगांव दरोबस्त व आंबडस निमे इनाम करून घेतला. निमे आंबडस महिपतगड तर्फेचें राहिलें तें प्रतिनिधीकडून इनाम करून घेतलें. एकूण दोन्ही गांव प्रथम दरोबस्त इनाम करून घेतले. मौजे डोरलें व माहळुंगें तर्फ पांवस हे दोन्ही गांव निमे महिपतगड तर्फेनें शके सु॥ ** सालीं परशरामपंत प्रतिनिधी यांजकडून महाराज शाहूराजे यांचे मुद्रेनिशीं इनाम करून घेतले. शके *** सुरुसन तिसा अशेरचे सालीं मौजे गोठणें देवाचें तालुका राजापूर हा गांव दरोबस्त कान्होजी आंगरे सरखेल यांजकडून इनाम करून घेतलें. हपशी यवन होऊन

१९. तिस्सां अशरीन मय्यां व अलफ =१११९=इ० स० १७१८.

२०. कान्होजी आंग्रे—शिवाजीच्या वेळीं तुळाजी आंग्रे ह्मणून आरमाराचा एक अधिकारी होता त्याचा पुत्र कान्होजी. राजारामाच्या वेळीं सिधोजी गुजर हा आरमाराचा मुख्य सरदार असतां त्याच्या हाताखालीं दुय्यम सरदाराची जागा कान्होजीकडे होती. हा मोठा चपळ असून शूर होता. मुंबई पासून तों तहद त्रावणकोर पर्यंत असणाऱ्या बंदरां पैकीं कान्होजीच्या तडाख्यांतून बचावलीं अशीं थोडींच बंदरें होतीं. सिधोजीचे पश्चात् तो आरमाराचा मुख्य सरदार झाला. पुढें ताराबाईचा पक्ष घेऊन शाहूशीं भांडत असतां त्यास बाळाजी विश्वनाथानें फोडून शाहूचा अंकित केलें. [पेशव्यांची बखर पृ० ११-१२ पहा.] मरणकाळ स० १७२८.

अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

श्री स्वामींस गांव इनाम देऊन आज्ञेंत तत्पर हे कान्होजी आंग्रे यांणीं पाहून त्या पेक्षां अधिकोत्तर स्वामींचे ठायीं निष्ठा धरून गांवसींव देऊन इमारतीचे कामास भिक्षा नक्त ऐन जिन्नस जे स्वामींची आज्ञा येईल ते शिरसा वंद्य करून साहित्य पुरवावें. त्रिंबक कृष्ण मोघे राधाबाईचे बंधु व संभाजी नारायण चिमणाजी पंताचे चुलत बंधु सुवर्णदुर्गी आंग्रे यांजकडे चाकरीस होते. ते नात्यामुळें आणून त्रिवर्गांनीं स्वामींस विनंती करून चाकरीस ठेविले. त्रिंबकपंतास चार रुपये दरमहा करून मौजे गोठणें येथें ठेविलें. संभाजी नारायण यास चार रुपये दरमहा करून स्वामींनीं आपले संनिध सेवेसि ठेविलें. मागाहून अंताजी नारायणही नात्यामुळें आले. त्यांसही चार रुपये दरमहा करून मौजे आंबडस येथें घर बांधून ठेविलें. मौजे मजकूरीं बाग होती तेथील देखरेख व जाबसाली कागदपत्र न्यावे. जें कामकाज पडेल तें करावें.

दिवसें दिवस इमारत कारखाना श्रीस्थळीं मातबर चालिला. धर्मशाळा, पोवळी[21], दीपमाळा, श्रीरेणुकेचें[22] देवालय, गणपतीचें देवालय, मारुतीचें देवालय, मुख्य श्रीचें देवालय याचा तिसरा घुमट, व पुढें लांकडी मंडप हीं कामें स्वामींनीं केलीं. पहिली कांहीं इमारत देवालयही नव्हतें. देव मात्रजीर्ण देवालयांत होता व बाणगंगेचीं तळीं पुरातन होतीं. तेव्हां दाभोळेमध्यें[23] *बतू साहेब ह्मणून यवनी होती तिचें जहाज बहुत दिवस समुद्रांत कोणे बंदरीं गेलें तें फिरोन येईना. आहे नाहीं हें वर्तमान कळेना. तिजला कोणी ह्या देवाचा चमत्कार सांगितला. तेव्हां तिनें परशुरामीं येऊन देवास नवस केला जे, माझें जहाज बहुत दिवस येत नाहीं तें स्वस्तिक्षेम आल्यास तुझें देवालय बांधीन. ह्मणून नवस केला. त्याजवर अविलंबेंच जहाज दाभोळेस दाखल जाहलें. मालमवसी[24] बहुत आणिली. तेव्हां तिनें नवस केल्या प्रमाणें देवाचें देऊळ दोन घुमट मात्र बांधिले होते. वरकड रेणुका आदिकरून कांहीं नव्हतें तें सर्व रचना स्थापना स्वामींनीं केल्या. ब्राह्मणांची वस्ती देवाजवळ स्वामी तेथें राहिल्यावर होत चालिली. देवा जवळ गुरवाचें मात्र घर होतें. पूजेला ठेविलेले ब्राह्मण हबशी यांचे दहशतीमुळें परागंदा होते, ते स्वामींनीं सर्व देवा जवळ आणिले. परशुरामकर ब्राह्मणांनीं पेढें येथील शेतीकडील कुणबावा

---

२१. पोवळी = देवळाच्या आवारा सभोंवतालची भिंत.

२२. रेणुका = ही परशुरामाची माता

२३. दाभोळ = हें विजापूरकर आदलशहा याचे वेळीं मोठें भरभराटीचें बंदर होतें. येथें मोठमोठ्या मशीदी अद्यापआहेत.

* बतुल (?) बडी (?)

२४. मालमवशी = मालमिळकत.

अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

करून ऐनगल्ला श्रीस्वामींचे कोठीस दाखल करावा याप्रमाणें वहिवाट चालली.

स्वामींचा वार्षिक नियम, परशुरामाचे पश्चमेकडे अरण्यांत नदीचा* ओढा ह्मणून आहे तेथें लहान गुंफा हाम चौरस तीन हात जाग्याची करून श्रावणमासीं एकवीस दिवस पर्यंत एकासनीं जप करीत सगाधिस्त बसावें. लहानद्वार आंत जावयासि ठेविलें होतें तें बाहेरून चिनून टाकावें. एकविसावे दिवशीं भाद्रपद शुद्ध चतुर्थीस बाहेर निघावें. ते दिवशीं आंग्रे यांजकडील कारकून व दोन तीनशें माणसें बरकंदाज† स्वारी यावी. त्याज प्रमाणें हबशी याजकडील अंजनवेल गोवळ [कोट] येथून कारकून स्वारी सुद्धां यावे. उभयता आंग्रे हबशी यांचे लोकांनीं ते दिवशीं निर्वैर होऊन स्वामींचे सेवेशीं तत्पर असावें. गुंफेंतून निघोन स्वामी परशुरामास येते समयीं डावे बाजूस §शामलाचे कारकून व स्वारीचे लोक बरकंदाज यांणीं वार सोडीत चालावें. त्या प्रमाणें उजवे बाजूस आंग्रे यांजकडील स्वारीचे लोकांनीं चालावें. याप्रमाणें समारंभें करून परशुरामीं देवासन्निध येऊन रात्रौ कीर्तनादि उच्छाह करून दुसरे दिवशीं ब्राह्मण-भोजन व आंग्रे हबशी यांजकडील झाडून लोकांस जेवण घालून निरोप द्यावा. या प्रमाणें वार्षिक नियम चालला. मौजे गोठणें येथें भार्गवाचे देवळाचें पूर्णगर्डी देवळाचें काम लाविलें.

शाहू महाराज दिल्लीहून औरंगजेब[२५] याचा निरोप घेऊन सातारप्रांतें चंदनवंदन किल्ले या नजीक फौजेसुद्धां राहून सातारियावर परशुरामपंत ताराबाईचे निसबतीनें शेखमिरा व परशराम त्र्यंबक होते. त्यांणीं शाहू महाराज यांसि फिरावून गोष्ट सांगितली. किल्ला न देतां. तेव्हां शेखमिरा यांचीं मुलें मनुष्यें वाईत होतीं त्यांची बातमी लावून, स्वारी पाठवून, धरून आणून, किल्याखालीं नेऊन मारावयाचा हुकूम महाराजांचा जाहला. हें वर्तमान किल्यावर शेखमिरे[२६] यास कळल्यानंतर अनुसंधान लाविलें जे "परशरामपंतास कैद करून किल्ला महाराजांस देतों." ऐसा करार करून सर्व शिबंदीचा फितूर करून स्नानसंध्येचे समयीं शेखमिरा यांणीं परशरामपंतास कैद करून, महाराजांचें निशाण किल्यावर घेऊन परशरामपंतास घेऊन महाराजांकडे आले. शेखमिरा यास[२७] सरफराज करून परशरामपंतास महाराजांनीं बेडी घालून गदाधरभट दिल्ली-

---

* नदीचा ?—जही (दी) चा ?

† बरकंदाज = चापाची बंदुक बाळगणारे.

§ शामल = यवन, हबशी.

२५. औरंगजेबाच्या मनांत शाहूस मुक्त करावयाचें होतें. तो मरण पावल्यावर त्याचा पुत्र अझिमशहा याणें त्यास मुक्त केलें.

२६. शेखमिरा—यांचे वंशज अद्याप वाईस आहेत.

२७. सरफराज = सरफराजी = पोषाख वगैरे देऊन खुषी करणें.

अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

तील पूर्व-समागमी जाणोन प्रतिनिधीचें पद त्यांस दिलें. भट्टी कारभार, यथास्थित बंदोबस्त न होय हें लक्ष महाराजांनीं समजोन परशरामपंत कैदेंत असतां महाराजांचे खर्चोवेचांचें साहित्य केलें. न्यून पदों दिलें नाहीं. पदा-योग्य मनुष्य जाणोन महाराजांनीं कृपा करून परशरामपंतास प्रतिनिधीचीं वस्त्रें[२८] दिलीं. बहिरोपंत पिंगळेयांसि पेशवाई होती. बाळाजी विश्वनाथ चंद्रसेना कडून महाराजांकडे आले ते कर्ते, उमदे पाहून सय्येदांचे कुमकेस दिल्लीस फौज सुद्धां जाण्याची आज्ञा केली. ते समयीं बाळाजीपंतीं विनंती केली, "आज्ञे प्रमाणें जातों. परंतु कांहीं एकपद असल्यास फलाणे महाराजांकडोन कुमकेस आले हा लौकीक महाराजांचा आहे." ऐसी विनंती ऐकून पूर्वील पिंगळे पेशवे यांजकडून पेशवाई काढून बाळाजीपंतास पेशवाईचीं वस्त्रें देऊन रवां-नगी केली.

ऐसें जाहल्या नंतर सैनें खमस अशरीनांत[३१] श्रीस्वामीघाट चढोन साताऱ्यासि शाहू महाराज यांजकडे आले. राजश्रींस वर्तमान कळतांच सामोरे जाऊन सन्मानें करून वाड्यांत आणून, पूजा करोन तीनगांव * * * मौजे धावडशी तर्फ परळी, व मौजे विरमोड प्रांत कऱ्हाड व मौजे अनेवाडी तर्फ कु-डाळ हे तीनगांव राजांनीं दरोबस्त कुलबाब कुलकानू[३२] इनाम देऊन राजपत्रें करून दिलीं. बाळाजी विश्वनाथ प्रधान यांसि पिंपरी गांव देण्याविषयीं आज्ञा केली. त्यांणीं पूर्वील स्वामींचा आशीर्वाद स्मरोन अधिकोत्तर निष्ठा धरोन आपले जिल्हेंतील गांव मौजे पिंपरी प्रांत तर्फ कढेपठार हा गांव दरोबस्त राजपत्रीं इनाम करून सन सीत अशरीन[३३] मध्यें दिला. मौजे विरमोड येथील देखरेखीस हरी टिळक ह्मणून ब्राह्मण होता तो ठे-विला. मौजे अनेवाडी येथील देखरेखीस नानो [जानो?] महादेव जोसी मौजे मजकूर यासि सांगितली. मौजे धावडशी येथें बाळाजी हरी अंतरकर ठेविले. पुढें त्यापासून सेवेशीं अंतर पडल्यानंतर सन शीत अशरि-

---

२८. परशुरामपंतास १७१३ मध्यें मुक्त केलें. परंतु त्याचे वडील पुत्रानें फितूर केल्यामुळें त्यास पुन: कैदेंत घातलें. नंतर धाकट्या चिरंजिवांनीं पराक्रम करून, शाहू राजास खुष करून, बापाची सुटका करविली.

२९. सय्यद हुसेनखान दक्षणेचा सुभे-दार. पे० ब० पृ० १६ टी० २० पहा.

३०. पेशवाईचें पद आंग्रे याचा हल्ला फिरविल्यावर पूर्वीच दिलें होतें. पे० ब० पृ० १४ टी० १४ पहा.

३१. खमस अशरीन म० अ० =११२५ =इ० स० १७२४.

३२. कुलबाब कुलकानू=सर्व प्रकार-चे कर व पट्ट्या वसूल करण्याच्या व काय-दा बजाविण्याच्या हक्का सुद्धां.

३३. सीत अशरीन=११२६ = इ० स० १७२५. हा पूर्वीच बाळाजीपंत वा-रले होते. तेव्हां हा गांव बाजीरावानें दि-ला असावा.

अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

नांत परशुरामींहून संभाजीपंत धावडशीस पाठविले. सन सैबा इशरिनांत सावनूर बंकापूर येथील पठाणानें हबशी सिद्दी[३५] सात अंजनवेल गोवळकोट येथें होता, त्यास हत्ती दिल्हा. परंतु परराज्यांतून हत्ती निभावून कोकणांत नेणें ही गोष्ट हबशी यासि न घडे. तेव्हां त्याणें स्वामींस पत्र लिहिलें जे, "आपली आज्ञा सर्व राज्यांत मान्य आहे. यास्तव वर घाटें आपा जोशी पाठवून, पंत प्रधान व पंत प्रतिनिधी यांचीं दस्तकें[३६] आणून द्यावीं" त्याचें उत्तर स्वामींनीं दिलें जे, "आह्मांस भिक्षार्थ सावनूर प्रांतीं जाणेंच आहे. तुमचे काय हत्ती असतील ते समागमें येतील. कोणाचे दस्तकाचें प्रयोजन नाहीं." या प्रमाणें सिद्दी सात यास उत्तर गेल्यानंतर दहा पठाण हत्ती आणावयासि स्वामीं समागमें जावयासि पाठवून दिले.

याजवर स्वामी सावनूर प्रांतें स्वारीस जावयाची तयारी करून समागमें खंडोजी साळवी व अंताजी नारायण व दाद गुरव व कर्णेकरी, निशाणदार वगैरे माणसें समागमें घेऊन सावनूर बंकापूर प्रांतें जाऊन सर्व प्रांताची भिक्षा घेऊन, सिद्दी सात यांजकडील पठाण पत्र सावनूरवाल्याकडे पाठवून हत्ती घेऊन मार्गी सांभाळून आणिला. तो विशाळगडचे घाटीं चौकीदारांनीं अटकाविला. तेव्हां स्वामींनीं किल्यावर अधिकारी यासि पत्र पाठवून हत्ती सोडविला. घाट उतरून कोकणांत मा ख ज ना स आले तों तेथें आंग्रे यांजकडील व हबशी यांजकडील चौकीचे लोक होते. आंग्रे यांजकडील लोकांनीं साफी करून जयगडाची स्वारी आणून हत्ती घेऊन चालिले. हबशी यांजकडील शें दोनशें माणसें चौकीवर होतीं, त्यांची व आंग्रे यांजकडील जयगडाचे स्वारीची लढाई जाहली. जयगडाचा जमाव भारी, त्यामुळें हत्ती घेऊन जयगडास गेले. हत्ती समागमें स्वामी नव्हते. स्नानसंध्येस मार्गीं दोन प्रहरां उतरून हत्ती पुढें मा ख ज नीं मुक्कामास पाठविला. स्वामी मागाहून येत तों अगोदरच जयगड करी हत्ती घेऊन गेले [होते].

ही बातमी हबशी याजकडील लोकांनीं गोवळकोटीं सिद्दी सात यास पाठविली जे, "गोसावी [यांणीं] हत्ती समागमें आणून माखजूनचे फडावर क[ला]चें निमित्य करून आंग्रे यांचे लोकांचे स्वाधीन हत्ती केला." ऐसी बातमी जातांच हबसी याची जात अविवेकी, परम विषम चित्तांत मानून, सिद्दी सात याणें गोवळकोटींहून स्वारी तयार करून, दोन तीनशें पठाण शिवरात्रीचे दिवशीं परशुरामास पाठवून

---

३४. सबा अशरीन = ११२७ = इ० स० १७२६.

३५. मूळांत याच ठिकाणीं "सैव दिसांत" असें आहे तो हस्तदोष आहे.

३६. दस्तक = परवाना, पास.

अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

ब्राह्मणांची व कारकुनांचीं व कारखाने यांचे लोकांचीं झाडून घरें जप्त करून, मोठा उपसर्ग करून व स्त वा ल स गें[३७] गोवळकोटास नेलें व इमारतीचें द्रव्य होतें [तें] व देवाची वस्तवानी, वस्त्रें सर्व गोवळकोटीं नेलें. कारकून होते त्यांतून ठरून राहतां चिमणाजी कृष्ण व बापूजी राम व लखमाजी कोठीवाला तिघेजण मात्र तळावर राहिले. वरकड माराचे भयेंकरून प्राण रक्षणार्थ सर्व पळून गेले. त्रिवर्गांची आब्रू घेऊन प्राणाशीं गांठ घातली. आयुष्य मर्यादेस्तव प्राण मात्र कुडींत राहिले "गोसांवी यांची ठेव रेव तुझे स्वाधीन आहे ती दाखविणें," ह्मणोन चिमणाजीपंताचे फार हाल केले. देवळांत पठाण हबशी शिरोन द्रव्य ठेविलें असेल ह्मणोन देवा भोंवतें चौगिर्दी[३८] परस्परच खळ्या खणोन पाहिलें. तेथें द्रव्य कोठून असणार ! कांहीं बंदही धरून नेले. या प्रमाणें दुष्टानें स्थळ उद्वस्त[३९] केलें.

माखजनीं स्वामी आले तों जयगड करी यांणीं हत्ती नेला हें वर्तमान ऐकतांच तेथील हवालदारास पत्र पाठविलें त्यांणीं उत्तर पाठविलें जे "स्वामींनीं समागमें हत्ती आणिला हें आह्मांस कळलें नाहीं. हबशी याचा हत्ती जाणोन कैद करून आणिला परंतु आतां सरखेलांची[४०] आज्ञा जाहलि या शिवाय सोडिला तरि आमचें पारिपत्य होईल. स्वामींनीं कुलाबियासि[४१] पत्र लिहून, हत्ती सोडणें ह्मणोन आमचे नांवें चिटी आणवावी आणि हत्ती न्यावा." तेव्हां स्वामींनीं कुलाबियासि कान्होजी आंग्रे सरखेल यांसि पत्र पाठविलें कीं, "तुमचे लोकांनीं आमचे समागमें हत्ती होता तो नेला सबब सिद्दी सात शामल याणें परशुरामीं स्वारी पाठवून, देव ब्राह्मणाचा उच्छेद करून, वस्तवानी जप्त करून, बंद धरून[४३] नेला. कारकुनांस मारहाण करीत आहे, तरि पत्रदर्शनीं जयगडकरी यास पत्र पाठवून हत्ती सोडवून देववणें. हत्ती न सोडल्यास तुझें कल्याण होणार नाहीं" असें स्वामींचें पत्र सरखेलास जातांच जयगडकरी यास चिटी दिली जे, "बेदिकत हत्ती बावा स्वामींचे स्वाधीन करणें." त्याजवरून हत्ती सोडला.

---

३७. वस्तवानी सर्व (?)

३८. चौगिर्दी = चौगर्दा = चोंहीकडे, सभोंवती, सर्वत:

३९. हिंदूंच्या देवस्थानांचा विध्वंस मुसलमान कसा करीत याचा हा एक छोटासा मासला आहे.

४०. सरखेल-हें उपपद आंग्रे यांस होतें. सर्खील = "निशाणांच्या समूहाचा अधिकारी" राज्यव्यवहार कोश.

४१. कुलाबा-अलीबागे जवळ-हा किल्ला आंग्रे यांचें आदिपीठ.

४२. 'न वि दिसांत शाम' असें मूळांत आहे.

४३ बंद धरून-बंध धरणें = बांधून ठेवणें, अटकेंत ठेवणें. भा० ब० पृ० १३० टी० ५६ पहा.

अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

तों समागमें घेऊन माखजुनाहून एक मजल हत्ती घेऊन स्वामी आले हें वर्तमान सिद्दीसात यास कळतांच परम लाचार होऊन जामीन घेऊन बंद सोडला. परशरामास तबीबें, औषधें, मलमें कारकुनाकडे बरें करावयासि पाठविलीं. दो चौ रोजांनीं श्री स्वामी हत्ती घेऊन गोवळकोटास आले तों सिद्दी सात ह्यानें हात जोडून, अन्यायी ह्मणोन, श्री स्वामींस अर्ज केला. "तकसीर माफ करावी" असें बोलून चीजवस्त नेली होती ते आणून दिली. श्री देवाचीं तीन पदकें जडावाचीं नेलीं होतीं तीं मात्र ठेविलीं. स्वामी सिद्दीस बोलिले "तुझा हत्ती आह्मीं आणिला तो घेणें. तूं अविचार करून देव-ब्राह्मणांचा उच्छेद केला अतःपर तुझा ही उच्छेद लवकरच होईल." असें बोलून परम रोष करून निघोन परशुरामास आले. देवळांत यवन शिरोन गर्ता खणिल्या, चिमणाजीपंत, बापूजी पंत, कोठिवळा यांचे मारामुळें कंठगत प्राण व इतर ब्राह्मण शूद्र सर्वत्रांस त्रास देऊन स्थळ उद्वस्थ केलें, हें अवलोकन करून चित्तास अधिकच संताप होऊन राजपुरीस सिद्दी सात याचा धनी याकुदखान याजकडे जाऊन बहुत क्रोधयुक्त शापोक्ति वदले. ती श्रवण करून सिद्दी सात याची अविचारी वर्तणूक ध्यानास आणून याकूदखान यानें बहुत प्रकारें विनंती केली जे, "मजला न विचारितां हें कर्म सिद्दी सात याणें केलें त्याचें पारिपत्य करितों. जें नेलें असेल तें माघारें देववितों. स्वामींनीं स्वस्थ चित्त करावें. गुन्हा माफ करावा." स्वामी बोलिले, "तुह्मी हबशीलोक बेइमान, अविचारी तुमचे राज्यांत राहणार नाहीं. अतःपर तुमचें कल्याण नाहीं." या प्रमाणें स्वामींचें भाषण ऐकोन खान याणें सिद्दी सात यास जरब पत्र लिहिलें जे, "मुल्ली गो फकीर लोक यांचें बहुत प्रकारें आह्मी चालवीत आलों. पुढेंही ज्यादा चालविणें अवश्यक असतां त्यांचे दरगियास स्वारी पाठवून, तसनस करून, चीजबस्त नेली. याचें कारण काय. उपरि देखत पत्र यांची परशरामींहून चीजबस्त जराबाजरा सुतळीचा तोडा आदि करून, झाडून माघारीं देऊन, पावती घेऊन हुजूर पाठविणें. दिक्कत करून, दिसगत केलियासि तुझा बळजा होणार नाहीं. तंगकरी देऊन पारिपत्य होईल." ऐसी ताकीद गेल्या नंतर झाडून चीजबस्त परशुरामास पाठविली. आणि देवाचीं पदकें आपण ठेविलीं होतीं तीं हुजूर राजपुरीस पाठविलीं

---

४४. बंद सोडला = कैद केलेले लोकांची सुटका केली.

४५. तबीब = शस्त्रवैद्य "तबीबस्तु भवेद्वैद्यः" रा० व्य० को०

४६. 'तुला गोफगीर' असें मूळांत आहे.

४७. जराबाजरा = किरकोळ सामानसुमान.

४८. दिक्कत = तकरार.

४९. बळजा = मुलाजा, क्षमा ?

५०. तंगकरी = तगेरी = फांटा देणें, पदच्युत करणें

अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

मर्ष होत नाहीं तर ऐसें नसावें. निरंतर पत्रीं सांभाळ करीत गेलें पाहिजे. या नंतर पो जंबुसर येथें राजश्री दौलत बाबुराव फौजसह जाऊन ठाणें हस्तगत केलें. यास्तव उपराळा करून अंमल बसवावा या अर्थी येथून कारकून व अरब पाठविले त्यांजला वर्तमान कळतांच निघोनें गेले ते समयीं सावकाराचा गल्ला व ठाण्यांतील वस्तभाव व पागेचीं घोडीं वगैरे जिन्नस कं म पे श पन्नास पंचावन हजार रुपयांचा नेला. ह्मणोन कारकुनाचीं पत्रें आलीं त्यास यंदा पर्जन्याचे कमतीमुळें माहाल दरोबस्त खराबीखालें आला. दरम्यान आरिष्ट उत्पन्न होऊन बहुत नाश केला. याजमुळें सावकार व इतर लोकांस नाउमेद जालें. पेस्तर आबादी होतां दिसत नाहीं. वस्तभाव ज्याची त्यास प्राप्त जाल्यानें पुढें उमेदवार होऊन माहालची आबादी होईल यास्तव आपल्यास लिहिलें असे. तरि राजश्री दौलत बाबुराव यांजला सरकारचे ताकीदपत्र द्यावें कीं, वस्तभाव व घोडीं, गल्ला वगैरे जिन्नस दरोबस्त माघारा देणें या प्रमाणें पत्रें येऊन सावकाराची वस्तभाव ज्याची त्यास प्राप्त जाली म्हणजे सर्वत्रांची खातरजमा होऊन माहालची उस्तवारी होईल बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

[ ५३ ] ॥ श्रीकृष्णप्रसन्न[1] ॥

श्रीसांबसदाशिवायनमः जो सांबसदाशिव कसा आहे कीं, सत्वरूप ह्मणजे असें चित्स्वरूप प्रकाश अवस्था-त्रय साक्षी जागृत कालीं त्यास विश्व स्वप्नकालीं तैजस सुषुप्तीकालीं प्राज्ञ असें ज्यास ह्मणनात. जो एकच आत्मा उपाधि-भेदें करून नाना प्रकारें भासतो. पाय नसतां चालतो. डोळे नसतां पाहतो. हात नसतां घेतो. कान नसतां ऐकतो. सर्वांतर्यामीं व्यापक हें कशावरून ? व आत्मा आहे हें कशावरून ? तर, दूर कोणी इंगितज्ञ बसला असतो त्याचा याचे आत्म्यांत [आरशांत?] प्रतिबिंबित होऊन तीच गाष्ट घेतो. व्यापकते व्यतिरिक्त कसें घडेल. असा आत्मा त्यासच आपणांत विसरून आनंद-स्वरूप सोडून दुःखांतील सुख भोगावयाची इच्छा धरितो. हेच त्या आत्म्याची माया. सत्य ह्मणतां नये, असत्य ह्मणतां नये. जिचें स्वरूप अनिर्वचनीय सत्व, रज, तमोगुणी तिजपासून अहंकार, आकाश, वायु, तेज,

---

१. हें बाळाजी जनार्दन ऊर्फ नाना फडणीस यांचें स्वालिखित आत्मवृत्त आहे. हें कसें प्राप्त झालें या विषयीं या लेखाच्या अंतीं हकीकत लिहिली आहे. हें इ सन १७६१ ह्मणजे पहिले माधवराव गादीवर बसत तों पर्यंत आहे.

अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

उदक, पृथ्वी पंचमहाभूतें महत्तत्व ह्मणजे अंतःकरण तदवच्छिन्न जें चैतन्य जो जीव अपंचीकृत पंच महाभूतें करून तदंशरूपें लिंगशरीरद्वारा जीवास सुख दुःखादि प्राप्ती. 'भोगायतनं शरीरं' भोगाचें स्थान शरीर होय. त्या शरीराची उत्पत्ती तर जें निंद्यस्थान योनी, व पुंस स्थानापासून रेत ज्याचे स्खलनें करून व स्पर्शें करून स्नान करावें लागतें, अशा निंद्य पदार्थी पासून शरीर वृद्धीतें पावतें. गर्भींच ल्यातें पावलें तर गेलें, वांचलें तर आंत अनेक जंतूंचे उपद्रव व जठरस्थ अग्नीनें दाह इत्यादिक क्षुधा-तृषा समयीं परिमार्जन न होणें. असे क्लेश भोगितां प्रसव वायूकडून कष्टें करून जन्म जाहालें ह्मणजे जाताशौच प्राप्त. तदनंतर रोगादिक वेदना आपणच मुक्यानीं सोसाव्या. षड्भाव विकार अस्ति, जायते, वर्धते, विपरीणमते, अपक्षीयते, नश्यति. हे षड्भाववत् विकार असा देही जो मी *त्याला लाहनपणीं अज्ञानें करून आवृत. परंतु पूर्व संस्कारें करून देवाची पूजा करावी हा छंद फार. याजकरितां ** मातोश्रींनीं मारही दिला. परंतु संस्कार दृढ- विद्याभ्यासा करितां मातापितर जे यांची शिक्षा तेणेंकरून लहानपणीं अज्ञानाकरितां चित्तास फार वाईट वाटून त्यांचेंही अनिष्ट चिंतीत असें. दाहावे वर्षीं विवाह झाला. विघ्नें पडलीं असतां निर्विघ्न केलें. पुढें अक्रा बारा वर्षां नंतर कामाविर्भाव शरीरीं होऊं लागला. तेणेंकरून व असत्समागम किंचित् झाला तेणेंकरून पापप्रवृत्ती होऊं लागली. रेतस्खलनही व्यर्थ करूं लागलों. मध्यें घोड्या वरून पडलों. अति व्यवस्था कठीण, दोन दिवस शरीर भान नाहीं. या प्रमाणें जालें असतां गोविंद जो त्याचे कृपेनें बरें केलें. पुढें पंधरावे वर्षी पित्याचा काळ झाला. त्यांचें और्ध्वदेहिक ईश्वरें करविलें. त्यांत पापदृष्टि एक समयीं जहाली. हा अपराध झाला. व्यर्थ रेतस्खलनें करून पाप व शरीर-नाश समजूं लागलें. तेव्हां सोडून देऊन निश्चय केला. परंतु कामाविर्भाव विशेष, येणें करून पापबुद्धी होत असे. पुढें परंपरा सेवाधर्म चालावा या योगें व श्रीमंतांची कृपा पुत्रवत्[३] असें जाणून कर्नाटक प्रांतीं श्रीरंगपट्टण[४] पर्यंत गेलों. परंतु प्रत्यहीं स्वप्नावस्था होऊं लागली. पुढें घरी आलियावर रमणीयोग मात्र अज्ञानच तेणेंकरून जाहला. परंतु पापबुद्धी निःशेष

---

*. जन्म—ज्येष्ठ शके १६६३.

२. पिता—जनार्दन बल्लाळ भानु.

३. परंपरेनें कसा चालत आला तें वंशावळ पाहिली असतां समजेल. पे० ब० पृ० १९ पहा. खेरीज भानूंचा व पेशव्यांचा घरोबा किती होता हेंही पे० ब० पृ० ११–१९ पाहिलीं असतां ध्यानांत येईल.

४. ही स्वारी १७५५।५६ त झाली ती. पे० ब० पृ० ६० टी० ६ पहा.

अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

सुटना. तेव्हां चित्तांत विचार केला कीं, पितामह[५] यांची बुद्धि धर्मशील असतां व सत्यवचनी एकनिष्ठ देव-ब्राह्मणांचे ठायीं परम भक्तीं; सात्विक आणि निषिद्ध कर्म करणेंच नाहीं ; असें असतां माझें चित्त पापाकडे थोडेसें कां जातें. ? याचा विचार करितां मातामह-पक्ष[६] अति व्यभिचारी तो संस्कार आहे. बुद्धीचा निश्चय करावा तत्रापि स्थिरता राहूं नये. तेव्हां संस्कार बलवत्तर. पुढें टोंक्यास अतिरुद्र करावयास गेलों. तेथें देवतार्चन-नेम धरिला. परंतु शरीरीं पीडा तेणेंकरून वैराग्य असें कीं, पर-स्त्री मनांतही येऊं देऊं नये. मग पाहणें कोठील ? मातोश्री व कुटुंब सहवर्तमान भाऊं बरोबर हिंदुस्थानांत जाऊन स्वर्गंगा त्रिपथ भागीरथीचें स्नान त्रिस्थली यात्रा करावी, अंतःकरण शुद्धी होईल, या भावने करून गेलों. त्या कालीं चित्तास अति वैराग्य. याचें कारण शरीरीं किंचित् पीडा. तेणेंकरून चित्त अति वैराग्यशील जहालें. कीं, एक भगवंताची पूजा व ध्यान मात्र करावें. उष्ण शीत यांचीही पीडा. परंतु चित्तास नाहीं. मातेचे ठायीं भक्ती होत्साता चाललों. ते नर्मदा महागंगेमध्यें स्नान करून एका वृत्तीनें ध्यान केलें. त्या दिवसा पासून उत्तरोत्तर वैराग्य अंतःकरण-शुद्धीच होत चालली. भाऊंचीं ममता विशेष व आंवेची व्यथा बहुत जाहाली, उठावयास शक्ति नाहीं, रेचन बहुत, ग्लानी फार तेव्हां कूच जहाले असतां मुक्काम श्रीमंतांनीं करवावा. त्याकालीं ईश्वरें आरोग्य केलें. पुढें दर मजल चरमन्वतीतीरीं गेलों. तेथें ग्रहण पडलें. स्नानदानादिकें करून आत्मा पवित्र होत्साता ध्यानें करून कालक्षेप चालत असे. पुढें सूर्यतनया यमुना इचेतीरीं गौ-घाटा जवळ गेलों. तेथें स्नान-संध्या करून दोहीं दिवसां नंतर मुक्तिपुरीं[७] श्रीमथुराक्षेत्रीं गेलों. तेथें क्षौर प्रायश्चित श्राद्धादिक करून तदनंतर पुढें भगवान् पूर्णब्रह्म राधाकृष्ण यांणें सकल लीला केल्या असें जें वृंदावन त्या स्थळास गेलों. तेथें कालिया-डोहीं कदंबवृक्ष ज्याजवर भगवान् बसून वस्त्रहरण करिता जहाला, त्याच्या शाखा अद्यापि यमुनेंत गेल्या आहेत, त्या खालीं जाऊन स्नान तर्पण करून तदनंतर गोपीचंदनाचे टिळे व तुळशीच्या माळा घालून भगवंताचें ध्यान करीत होत्साता वृंदावनांत अटलबिहारी व कुंजबिहारी व बालाबिहारी, राधाकिशोर, गोविंदजी या भगवंताच्या मूर्ती यांचीं दर्शनें घेतलीं. त्यांत कुंजबिहारी मध्यानकालीं चौपाळ्यावर निद्रिस्थ, कपाट लागलेलें, परंतु चौपाळ्याची दोरी बाहेर ओढीत

---

५. पितामह--बाळाजी महादेव भानु.

६. मातामह पक्ष कोणता ? मेहेंदळे तर नव्हेत ? पुढें टी० ९ व १२ पहा.

७. या सप्त मुक्तिपुर्‍या प्रसिद्ध आहेत. अयोध्या मथुरा माया काशी कांची अवंतिका । पुरी द्वारवती चैव सप्तैता मोक्षदायकाः ॥१॥

अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

असत. ती आपले हातीं ओढून भगवान् जो यास आंदोलन-लीला केली. तेथोन शृंगारवट जेथें भगवंतें राधेस शृंगार केले, तेथें जाऊन वट-दर्शन घेऊन पुढें बंशिवटी ह्मणजे जेथें भगवंतें मुरलीवादन केलें, तेथें जाऊन वटाचें दर्शन केलें. तेथून सेवाबन, कुंजबन हीं स्थळें, कुंज कसे कीं भगवान् लीला करितो असाच भास होत असावा. सर्वही वृक्ष छत्राकार ठेंगणे भूमिस्थ पल्लव कंटक वृक्षासही परंतु [?] कंटक नाहीं. हें पाहून आनंदमय होत्साता यमुनातीरीं रेतींत भगवान् जो याणें बाळरूपीं लीला केली. पादारविंद संबंधी रेणु रज:कण त्याची प्राप्ती मस्तकीं वंदावया करितां ब्रह्मादिक देव इच्छितात. तेथें जाऊन लोळून ती रेती मस्तकावर घेतली. तेथोन ज्ञानगुदडीस [?] गेलों. तेथें थोर थोर संत, महंत, बैरागी भगवत्पर होत्साते, सायंकाळचे साहा घटिका दिवसास येऊन बसून पुराण-श्रवण करीत आहेत. भगवंताच्या कथा नामें गाताहेत. त्यांचें दर्शन घेऊन चार घटिका पाहून चित्त बहुत शांत जहालें. तदनंतर धीरसमीर जे यां प्रति कालिंदी-तीरीं जाऊन सायंकाल संध्या करून भगवान् सांबसदाशिव जो याचें एकाग्र मनें करून ध्यान करून येता जहालों. याप्रमाणें तीन चार दिवस क्रमिले. अनेक जन्मांचें पुण्य कीं, असें वृंदावन दृष्टीस पडलें, तेणें करून भगवंताच्या मूर्ती व भगवद्भक्त त्यांचे दर्शनें करून नेत्र पवित्र जाले. पादें करून चालत गेलों तेणें करून पायांचें सार्थक जाहालें. हस्तें करून नमस्कार करिता जहालों तेणेंकरून हस्त पवित्र झाले. मुखेंकरून नामस्मरण केलें तेणेंकरून मुख पवित्र झालें. कर्णीं करून भगवत्कथा-श्रवण केलें तेणेंकरून श्रोत्र पवित्रता पावले. स्नानें करून सर्व देह पवित्र झाला. ज्या वृंदावनांत बैरागी एकाग्र वृत्ती करून ध्यानस्त होत्साते कुंजाखालीं जागां जागां बसले आहेत; कोणी पर्णेंच भक्षून, कोणी जल प्राशन मात्र करून कोणी दुग्ध सेवन करून, कोणी सिद्धान्न आणून घालील तेंच खाऊन राहिले आहेत; अशांचें दर्शन घेऊन सत्समागमाचें माहात्म्य किंचित् आनंदातें पावलों. त्यांत एका बैराग्यानें कृपा करून एक मंत्र भगवंताचे नामाचा सांगितला, कीं याचा जप करीत जावा. तो भगवंतेंच सांगितला असा मानून, सर्वांस यथाशक्ति देणें देऊन संतोषातें पावलों. पुढें दिल्लीस गेलों. तेथें पृथ्वीपतीचें[७] दर्शन श्रीमंतांचे आज्ञेवरून घेतलें. त्याणीं बहुत कृपायुक्त भाषण करून आशीर्वाद देऊन आपले जवळील वस्त्रे दिलीं तीं

७. पृथ्वीपति=बादशहा. जवानबख्त ह्मणून एक ल्हान शाहाजादा भाऊनींच गादीवर बसविला होता. भा० सा० ब० पृ० ९५ पहा.

अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

घेतलीं. किंचित् संतोष जाहला कीं, भगवंताचे कृपेचे अंतर्वर्ती ही कृपा आहे. तदनंतर श्रीमंतांचे लष्करांत श्रीमंतांजवळ आलों. बसलों असतां भूमीकंप जाहला. परंतु भगवंताचें ध्यान चित्तांत आणिता जालों. दिल्लींतील चित्रें वगैरे विषय ज्यांत पाप नाहीं असेही घेतले. पाहिले. पुढें उत्तरेकडील यवनें[8] शत्रुत्वें करून यमुना पैलतीरीं पाऊण लक्ष सेनेसहवर्तमान येऊन उतरला. परंतु यमुना भरपूर चालली तेणेंकरून उभयपक्षीं स्तब्धताच जाहली. पुढें कुंजरपुरा श्रीमंतांनीं शौर्यें करून घेतला. मीहि युद्धांत होतों. ईश्वरें रक्षिलें. तों इतकियांत यवन आलीकडे आला. श्रीमंत सैन्यासहवर्तमान त्याचे समोर गेले. गांठ पडली. तेव्हां मी तर लहान श्रीमंताचे बुद्धीस महानबुद्धी [?]. परंतु भावी अर्थ तेणेंकरून विपर्यास पडला. आप्त होते बळवंतराव[9] मातुल व नाना पुरंधरे वगैरे ते अनाप्त झाले. जे अनाप्त शाहनवाजखानी[10], भवानी शंकर वगैरे ते आप्त जाहले. त्यांचे वाक्याचे ठायीं विश्वास, तेणेंकरून आपली रीत युद्धाची सोडून यवनाची रीत[11] धरिली. परस्परें युद्ध होत असे. गोळे प्रत्यहीं शत्रूचे राहुटीवरून जात. मातोश्री व स्त्री भयभीत होत. कीं कसें होईल ! ते ते समयीं मातोश्रीस विनंती करीत गेलों. कीं मी विनंती करितों. एक ईश्वरीं लक्ष असावें. त्यांत मातुळ[12] युद्धांत होते ते पडले. ते दिवशींच सर्व सैन्य नाशास पावावें. परंतु रात्र जाहली यामुळें राहिलें. त्या दोन महिन्यांत मनुष्यें, पशु बहुत मेले. अन्नाची महर्गता. दुर्गंधी एकेच ठिकाणीं. असे श्रम पाहिले. पुढें मातुळाची स्त्री समागमें गेली. मातोश्रीस श्रम फार जाहले. होणार अवश्यक होतें. यदर्थी संदेह धरूंच नये. हा माझा निश्चय. पुढें थोरलें *युद्ध उदयीक होणार. तों पूर्व दिवशीं संकेत कीं, पराजय आपला जाहला तरी शत्रूचे हातीं श्रीमंताचें कुटुंब व आपलें हातीं लागूं नये. आपणच नाश करवावा. आपण तर वांचत नाहीं असा सिद्धांत करून श्रीमंतांनीं याची ही योजना केली. दुसरे दिवशीं तयार होऊन प्रातःकालचे दोन घटिका दिव-

---

८. यवन अहमदशहा अबदाली हा या काळीं २४ दस्ते फौजेसह आला होता. सुमारें १२ शें लोकांचा एक दस्ता.

९. बळवंतराव मातुल—हे बळवंतराव गणेश मेहंदळे असावे असें वाटतें. मागें पृ० ३५ टी० ६ पहा. नाना म्हणतात मातुळ अनाप्त झाले. परंतु दुसरे लेखांत बळवंतरावांच्या मसलतीनेंच भाऊसाहेब चालत असत असें म्हटलेलें असतें.

१०. हे दिल्लींतील पादशाही मुत्सद्दी—

११. एक जागां खंदक करून राहणें ही रीति—ही यवनी रीत इभ्राइमखां गाडदी याचे मसलतीवर व बळावर पतकरली.

१२. मातुळ—बळवंतराव मेहंदळे ? पुढें कुटुंब सती गेलें असेंही आहे तेव्हां हे मातुळ मेहंदळेच असावे. भा० सा० ब० पृ० ११४ १५–१६ पहा.

* थोरलें युद्ध—पौष शुद्ध ८ शके १६८२ भा० सा० ब० पृ० ११९ व पुढें.

अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

सास युद्धास गोळागोळीचा प्रारंभ जाहला. श्रीमंत अति बुद्धवान्, धैर्यवान्, शूर, कृतकर्मे गर्व मात्र विशिष्ट, परंतु तर्तुद फारच सैन्याची वगैरे केली. शेवटीं निशाणा जवळील तर्तुद एकीकडे जाऊन शत्रूची मुख्य स्थानींच गांठ पडली. मी श्रीमंता सांनिध ईश्वरस्मरण किंचित् करून असें. तो विश्वासराव यांस गोळी लागली. पडले. ते हत्तीवर श्रीमंतांनीं घालून उभेच राहिले. तों पठाण पाय उतारा आंत येऊन मिसळले. तोडातोडी होऊं लागली. आणि डावे बाजूचे मातबर सरदार, चौघड्याचे धनी देखील, पूर्वींच पळाले. उजवे बाजूचे ही होळकर शिंदे निघोन निशाण निघालें. दोन तीन शत पायदळ होतें. श्रीमंत दिसेनातसे जहाले. तेव्हां ईश्वरें बुद्धी दिली. माघारे फिरलों. पूर्वीं युद्धांत बापूजी[13] पंतीं बोध केला. माघारे फिरावें. त्यांस उत्तर केलें कीं, अशा समयीं श्रीमंतास सोडणें ठीक नाहीं. परतु पुढें या प्रमाणें जहालें. लक्ष सैन्य त्यांत मोठे मोठे सरदार असतां एकही त्या समयीं श्रीमंतास आप्त न जहाला. बहुत दिवस अन्न भक्षिलें. कृपा पुत्रवत् केली. तितकें चांगला काळ होता तेव्हां केशास ढका लागल्यास प्राण देऊं अशा प्रतिज्ञा. परंतु ईश्वर घटित विपरीत काळ त्यांत सोबती कोण होतो ? सर्व सुखाचे सोबती. भोजन आदरें करून करावें. वस्त्रें, जवाहीर, जागिरा, घ्याव्या. निदानीं इतक असून ज्यांचे देहाचें ठिकाण कोणास ठाऊक नाहीं. सर्व वाताहत जहाले. मी सायंकालचे दोन घटका दिवसास घोड्यावर पाणिपतांत आलों. त्या देशाचा मार्ग अगदीं ठाऊक नाहीं. तेथें परमेश्वरें वाट दाखवावया पुरते रामाजीपंत उभे होते. सांगूं लागले घोडें वस्त्रें टाकून द्यावीं. त्या वरून सर्व टाकून शुद्ध लंगोटी लावून बसलों. रात्र जहाल्या वर चाललों. तों एका कोसांत तीनचार वेळ शरीरास हात लावून टोपीवाल्यांनीं झाडा घेतला. दर खेपेस समागमेंचे दाहावीस तोडून टाकीत. त्यांत मी राहिलों. हे सत्ता ईश्वराची. परंतु बापूजीपंत, रामाजीपंत, राहातच गेले. असे जातां दाहा बारा कोश पश्चिमेकडे गेलों. तों तेच शत्रु येऊन रामाजी पंत बापूजीपंत वगैरे यांस जखमी भारी केलें. पडले. मी एकटा राहिलों. तो गवतांत गेलों. ईश्वरें तृणें करून माझें रक्षण केलें. त्यांस मोहनी घातली. सर्वांस मारिलें असतां मी जवळ असतां न मारिलें. व गवत लांब असतां जाऊं दिलें. पुढें ते गेल्यावर जाऊं लागलों. तों पुढें दोन कोशावर दुसरे मागती दृष्टीस पडले. तेव्हां मागती तृणांत जाऊन ब-

[13] बापूजीपंत–कोण ?

अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

सलों. तों जवळ येऊन काढूं लागले. ते समयीं ईश्वर त्यांतीलच एका वृद्धाचे मनांत संचार करिता जाहला. कीं कशास मारितां? मग गेले. तदनंतर माझी शक्ति पाणिपतावर बहुत क्षीण, आमविकारादिक विकारयुक्त, अन्न चालेना, असा मी त्याजवर दयासमुद्र सांबसदाशिव जो याणें कृपा करून शरीर अशक्त, ऊन पाहिलेंच नाहीं, व पादचारी अभ्यास नसतां सोळा सत्रा कोश अन्न उदका व्यतिरिक्त आलों. क्षुधा तिसरे प्रहरीं लागली. तेव्हां बोरीचा पाला सांपडला तो खाऊन पाहिला. तो तोंडांत जाईना. तसाच सायंकाळीं एका ग्रामाबाहेर आलों. तों एका बैराग्यानें पीठ आणून दिलें. त्याची भाकर खादली. ती अमृत-प्रमाण लागली. नंतर निद्रा केली. प्रातःकालीं गंगा-सहस्रनाम ह्मणत ईश्वर-स्मरण करीत चाललों. तों एका गांवामध्यें गेलों. तेथें एक साहुकार होता, त्यानें घरीं नेलें. भोजन एक ब्राह्मण होता, व यशवंतराव चाबुकस्वाराकडील भेटला, त्याजकडून स्वयंपाक करवून भोजन केलें. तो शत्रूचे स्वार गांवांत आले, हें वर्तमान कळलें. तेव्हां साहुकार ह्मणाला कीं आह्मी गाडी करून जयनगराकडे पावते करितों. गाडींत बसून चाललों. तों पाहिलें कीं हा फसवितो. असें बुद्धीस येऊन गाडी टाकून पाय उतराच होउन चाललों. बरोबर दोन तीन ब्राह्मण, दोन मराठी माणसें, याप्रमाणें दाहा बारा कोश गेलों. असे सात दिवस पायीं चाललों. नित्य भोजनाचें साहित्य ईश्वर देववी. तेणें करून समागमचे मंडळी सुद्धां भक्षून रेवडी[१४] पावेतों आलों. तों लष्करचे पळे त्या वाटेनें गेले. त्यांस गांवांत बाळोराव ह्मणून चौबे भाऊ असत. ते माझें नांव ऐकून पुसत कसे आहेत? चेहरा कसा? खुणा खाणा सर्व त्यांणीं पुसून घेतलें. मागाहून हे येतात हें जाणून मार्गावर नेहमीं पाहात बसत. आह्मी आलों तों त्यांणीं रेवडी बाहेर ओळखिलें. पुसूं लागले. नांव न सांगावें हा निश्चय, परंतु तो आंगींच नांव लावूं लागला. त्याचे बोलण्यांत वांकडी गोष्ट नाहीं. आह्मांस साहित्य करून द्यावें, उपकार करावा हें पाहिलें. तेव्हां नांव सांगितल्यावर आपले घरास मंडळी सुद्धां नेऊन उत्तम प्रकारें भोजनाचें साहित्य करून दिलें. भोजन केल्यावर वस्त्रें दिलीं. तदनंतर रामजी दास जोशी मातबर रेवडींत असे त्यास वर्तमान कळल्यावर त्याणें आपले घरीं नेऊन ठाविलें. सात दिवस भोजनास व उत्तम वस्त्रें दिलीं. पुढें आमचे मानस *दांग भरतपुरास

---

१४. मुळांत 'रेवाऊ' असें सर्वत्र आहे परंतु तें मोडींतून बाळबोध करणाराच्या नजरचुकीमुळें पडलें असावें हें स्पष्ट आहे. रेवडी हें शहर दिल्लीच्या वाटेवर मुक्कामाची जागा आहे.

* मुळांत 'दीक भरतपुरास' असें आहे.

अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

आवयाचें. परंतु तो ह्मणे सोबत चांगली लावून गाडी करून देऊन पावतें करीन. त्यावर एक लग्न निघालें. त्या बराबर गाडी करून देऊन बराबर पेढे साहित्य करून दिलें. आह्मी निघालों तों वाटेंत कृष्णंभट वैद्य आले. त्यांणीं सांगितलें कीं, स्त्री बिरोजी बारावकरें यांणीं संभाळून आणिली. ती जि ग नी स नारोपंत गोखले यांचे घरीं आहे. तेथें त्या गृहस्थानें साहित्य वस्त्र पात्रांचें केलें. आह्मी तेथें गेल्यावर भोजन क्षिरीचें घातलें. तेव्हां आनंद झाला. मग स्त्रीस एक गाडी दुसरी करून तेथून निघालों. तों दिगेस आलों. तेथें पुरुषोत्तम महादेव पाणिपताहून आले होते. ते वानवळे यांचे गुमस्त्याचे बिन्हाडास राहिले होते. त्यांस कळतांच त्यांणीं आपले बिन्हाडास नेलें. तेथें कुटुंब सुद्धां कमकसर महिनाभर होतों. क्षुधा फार लागत असे. त्यांणीं वस्त्रें वगैरे साहित्य भोजनाचें चांगलें केलें. तेथून मातोश्रीचा शोध फार केला. परंतु घरचा खिजमतगार बराबर होता त्याणें सांगितलें कीं, घोड्यावरून पडून जखम लागून मेली.[१६] हेंच ठिकाण लागलें. पुढें पालखी व घोडीं घेऊन ढवळपुरावरून ग्वाल्हेरीस सारें लष्कर पळून पार्वतीबाई, नाना पुरंधरे, मल्हारजी होळकर सारे होते तेथें आलों. अंतःकरणापासून होतें कीं, श्रीकाशीस जाऊन नेहमीं वास करावा. प्रपंचांतील विषय-मात्रीं दुःख हें पुरतें समजलें. परंतु देहप्रारब्ध बळवंत. तेथें आलियावर सर्वांनीं निषेध केला. एकदां देशीं जावें. मातोश्रींचा विधी करावा. वगैरे कित्येक प्रकार काशींत गेल्यावर कसें होईल. पाणिपत जालें तेव्हां काशीही कसी होते. असें चित्तांत येऊन लष्करा बरोबर येऊं लागलों. पाणिपताचें वर्तमान श्रीमंत नाना साहेबांनीं ऐकून माझें स्मरण फार गुरूंजीं जवळ केलें कीं, त्याचें शरीर अशक्त, कसा निभाव होईल? परंतु ईश्वरकृपेनें व त्यांचे आशिर्वादें महत्संकटांतून पार पडलों. पुढें श्रीमंत नानासाहेब यांचे दर्शन बराणपुरावर जालें. पाहतों तों शरीर फार क्षीण जाहलें आहे. मर्जी बेतऱ्हीं[१८] जाली आहे. बहुतांच्या अब्रू क्षणक्षणां जातात. परंतु मजवर सदयतेनें लोभेंकरून भाषण करून वर्तमान पुशिलें. सांगितलें. तीन चार दिवस बरोबर राहिलों. श्रीमंत गोपिकाबाई व नारायणराव यांस देवी आल्या. करितां त्या सहवर्तमान नर्मदातीरीं

---

१५. बारावकर—हा पार्वती बाईस आपल्या घोड्यावर घेऊन तिचें प्राणरक्षण करणारा 'बारवेकर' असावा. भा० सा० ब० पृ० १२८ पहा. नानांची आई व कुटुंब या युद्धांत पार्वतीबाई जवळच होतीं.

१६. 'गिलचे यांजकडे सांपडली' असें भा० सा० ब० पृ० १२८ येथें लिहिलें आहे.

१७. हे गुरुजी कोण?

१८. बेतऱ्हा=बिघडलेली, तऱ्हेवाईक.

अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

जरि काय न हर्षविला करितो भलता दहांत बोभाट ॥ ८४ ॥
श्रीविष्णुपदा देसी प्रणतांतें सुवर नित्य नव लक्ष ॥
धवल क्षयरहित तुझें यश ऐसा शारदेंदु न वलक्षें[29] ॥ ८५ ॥
करिति तुझ्या तीरा जन नीराजन गुरु ह्मणोनियां गाती ॥
त्यां गति गंगा दे जी न मिळे योगा करूनि यागा ती ॥ ८६ ॥
श्रीविष्णुपदा पावे तुज जो त्याला नसे उणें कांहीं ॥
त्वत्तीर्थधरें जीं जनवृंदें न महेशसीं गुणें कां हीं ॥ ८७ ॥
विष्णुपदा दीनातें पावसि तैसें चि तूं सदा पावें ॥
मज अनुमोदन दिधलें ज्यांहीं त्यांतें यमें न दापावें ॥ ८८ ॥
सर्व मनोरथपूरक जें जोडावें जगांत जन्मुनि तें ॥
विष्णुपदा सद्धन तूं बहु संमत नारदादि सन्मुनितें ॥ ८९ ॥
विष्णुपदा वदसील व्रत माझें मुख्य होय रे बा हें ॥
उद्धरितो सर्व प्रिय करितों न सखे न सोयरे बांहें ॥ ९० ॥
विष्णुपदा या हो या ऐसें पावावया यश बाहूं ॥
त्वां न वळवितां ह्मणतिल विषयरतमति प्रजा कशा बाहूं ॥ ९१ ॥
तुज विष्णुपदा श्रीकरपल्लवसंलालिता असो नमन ॥
तूंतें सोडुनि पळ ही माझें विषयीं कधीं वसो न मन ॥ ९२ ॥
विष्णुपदा त्वां दर्शन दिधलें गणिलें न कर्म फटकळ तें ॥
अज्ञ जनास हि करुणाक्षांत्यादिगुणें प्रभुत्व अटकळतें ॥ ९३ ॥
षड्रिमदा मोहगदा हरुनि सदा करिसि मुदित साधु सदा ॥
विष्णुपदा अमृतनदा ह्मणसि वदान्यवर तूं न हंत वदा ॥ ९४ ॥
विष्णुपदा तूं प्रभुसी स्वाश्रितसंसारकंपदा तुळसी[30] ॥
कीं वाहिली तुला ती देती पुरुषार्थसंपदा तुळसी[31] ॥ ९५ ॥
नमनें तोखे दास श्रीविष्णुपदा धरील जो भावा ॥
न मनें तो खेदास स्थळ होय यशें जगांत शोभावा ॥ ९६ ॥
विष्णुपदा साङ्ग करीं केलें पिंडप्रदान तुजवरि तें ॥
मन तूं तें धन्य करिसि हें ऐकुनि साधुकथित गुज वरितें ॥ ९७ ॥
विष्णुपदा तव संश्रित गोकुळजीप्रमुख जो गयावळ तो ॥
मुदित असो कीं प्रणतीं दीन जनीं करुनियां दया वळतो ॥ ९८ ॥
श्रीविष्णुपदा द्यावें सद्यश तुज हेचि डावकीलीला ॥
मी पांडुरंगराया आलों मागोनि या वकीलीला ॥ ९९ ॥

---

२९ वलक्ष=शुभ्र. ३० तळसी=बरोबरी करिशी. ३१ तुळशी=तुळशीपत्र.

अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

शरणागतें मयूरें विष्णुपदा या समर्पिल्या आर्या ॥
जेंवि प्रसादतुळसी भगवद्भक्ता जना सदा धार्या ॥ १०० ॥

॥ इति श्रीरामनंदन-मयूर-विरचिता श्रीविष्णुपदपद्म-वकीली संपूर्णा ॥

समाप्त.

---

## भस्मासुर आख्यान.

### श्लोक.

जो समर्थ भव मोक्षक राया ॥ साधु गाति भवमोक्ष कराया ॥
तत्पदें नमुनि सादर सारा ॥ कीर्ति गा हरि असा दर सारा ॥ १ ॥
पूर्वी होता अमर्त्यंतर[1] शकुनिसुत क्रूर त्याची वृकाव्हा[2] ॥
हिंस्रत्वें निर्दयत्वें त्यजुनि मद ह्मणे दूर सिंहा वृकां[3] व्हा ॥
ऐसा अन्वर्थनामा[4] असुर खळमणी तो पथीं नारदास ॥
प्रेक्षी वंदी प्रबद्धांजळि विनवि जणो तत्पदाधार दास ॥ २ ॥
देवर्षीस ह्मणे स्वपादविनतस्वांतें[5] प्रमोदावहा ॥
तूतें या भुवनांत सर्व ह्मणती पापाटवीदाव[6] हा ॥
सर्वज्ञा हरितोसि संशय पळें तो पाहिला आजि तूं ॥
आह्मीं वांछितसों तुझ्या सुवचनें संदेहवृंदा जितूं ॥ ३ ॥
देवर्षिप्रवरा असें पुसतसें कीं विष्टपाचे[7] धणी ॥
ब्रह्मेशाच्युत हे तिघे स्वभजकां देती सुखाची धणी[8] ॥
यांमध्यें परि आशुतोष[9] सुर तो कोण प्रभो हें तुह्मी ॥
सांगा जी भवदंघ्रिला समजलों कामाप्तिचा[10] हेतु मी ॥ ४ ॥
वृकासुर असें पुसे नमुनि जोडुनीया शयां[11] ॥
क्षणांत समजे मनीं सुरमुनी तदीयाशया ॥
ह्मणे मग तयासि तो शकुनिनंदना हा बरा ॥
विचार पुसिला तरी भज सुखार्थ आशांबरा[12] ॥ ५ ॥
होतो तुष्ट महेश अल्पचि गुणें तत्काळ दासावरी ॥

---

१ अमर्त्यंतर=देवांहून अन्य (दैत्य). २ आव्हा=नाम. ३ वृक=लांडगा. ४ अन्वर्थनामा=यथार्थ आहे नांव ज्याचें असा. ५ स्वांत=मन. ६ अटवी=अरण्य. ७ विष्टप=स्वर्ग. ८ धणी=विपुलता. ९ आशुतोष=लवकर संतुष्ट होणारा. १० कामाप्ति=मनोरथ पूर्ति. ११ शय=हात. १२ आशांबर=दिगंबर (शिव).

अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

भक्तांला स्वकरें सुतासम शिवाजानी[13] स्वयें सांवरी ॥
कोपे ही प्रभु हा तसा चि सहसा स्वल्पा हि दोषास्तव ॥
याच्या होय न कीर्तिचा तिळ सहस्रास्यें हि शेषा स्तव ॥ ६ ॥
बंदीच्या परि रावणें निशिचरें केला पदाचा स्तव ॥
भोळा शंकर हा प्रसन्न चि तदां जाला तया यास्तव ॥
बाणें ही स्तवुनि प्रहृष्ट करुनी मागीतला हा वर ॥
स्वामिन् मत्पुर रक्ष हें च मज दे हो सिद्ध पाहा वर ॥ ७ ॥
बाणाचें पुर रक्षिलें पुरहरें विश्वेश्वरें श्रीहरें ॥
केलें तें वरदानवाक्य हि खरें त्या चंद्रमःशेखरें[14] ॥
तो दिक्तुंड[15] हि पुंड खंड परशु स्थानाचलोत्पाटनीं ॥
झाला सज्ज परंतु देव निजला होता क्षमापाटनी ॥ ८ ॥
भक्ताला अति तूर्ण शंकर सुधापूर्णेक्षणें पाहतो ॥
तद्वांछावर द्यावया वरद तो त्याच्या पुढें राहतो ॥
त्याचा भार समस्त ही स्मरहर स्वामी स्वयें वाहतो ॥
त्या पासूनि सुसंकटें घडति जीं त्यांला सुखें साहतो ॥ ९ ॥
त्या शांकुनेया[16] विभुला भजावें ॥ घडेल हो सत्वर लाभ जावें ॥
सांगोनि ऐसें हित त्या वृकास ॥ गेला स्वयें नारद सावकास ॥१०॥
केदारीं जाउनीयां मग असुर वृक स्वांगमासासि होमी ॥
भेटेना देव तेव्हां निज शिर हि ह्मणे छेदितों आज हो मी ॥
खंडाया मस्तकातें स्वधितिस[17] दिवसीं सातव्या घे करानें ॥
कुंडापासूनि तेव्हां प्रकटुनि सहसा वारिला शंकरानें ॥ ११ ॥
ज्याकाळीं करुणाब्धि धूर्जटिकरस्पर्शामृता लाभला ॥
तेव्हां तो परिपूर्णदेह पहिल्याहूनी हि जाला भला ॥
होता केवळ अस्थिशेष हवनीं कापूनि घेतां पळीं[18] ॥
तो केला क्षतहीनकाय वरदें लागों न देतां पळा ॥ १२ ॥
मूर्द्ध[19]च्छेदनसाहसांतुनि बळें बाहेर तो काढिला ॥
मांसाच्या परिकर्तनें[20] करुनियां होता चि जो कां ढिलें[21] ॥
श्रीकंठ त्रिजगच्छरण्य वरद प्रीतिप्रसन्नेक्षण ॥

---

१३ शिवाजानी=पार्वती आहे स्त्री ज्याची तो. १४ चंद्रमःशेखर= चंद्र आहे कपाळावर ज्याच्या तो. १५ दिक्तुंड=रावण १६ शांकुनेय=शकुनिपुत्र (भस्मासुर). १७ स्वधिति=कुऱ्हाड. १८ पल=मांस. १९ मूर्द्ध=डोकें. २० परिकर्तन=कापणें. २१ ढिला=शक्तिहीन.

अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

श्रीमच्छंकर हें वदे करुनियां तत्प्राणसंरक्षण ॥ १३ ॥
होतों मीं वरद प्रसन्न सदयस्त्वांत प्रपन्ना[22]वरी ॥
देतों शीघ्र वरासि धांवुनि सुखें जो ज्या चि कामा[23]वरी ॥
मांस च्छेदुनि होमिलें शिखिमुखीं[24] हें काय भक्ता बरें ॥
आत्मा व्यर्थ चि पीडिला मज हि तां[25] केलें बहू घाबरें ॥ १४ ॥
सकृ[26]न्नामोच्चारें करुनि अथवा केवळ जळें ॥
फळें पत्रें पुष्पें स्तवननमनें का स्मृतिबळें ॥
भवांभोधिमिध्यें मदुपनत तो भाविक तरे ॥
किती घेती भावें मज विगतलोभा विकत रे ॥ १५ ॥
जो कांहीं असुलभ होय या हि मागें[27] ॥ आतां हो पुढति हि तूं तया हि मागें[28] ॥
हें माझें वचन मनांत मान साचें ॥ सांगावें अभिमत जें स्वमानसाचें ॥ १६ ॥
श्रवण करुनि ऐसें वाक्य तो पंकराशी[29] ॥
असुर वृक ह्मणे त्या दुर्लभा शंकरासी ॥
स्वकर शिरिं जयाच्या मी चि ठेवीन लोकीं ॥
लव उशिर न होतां तो मरावा त्रिलोकीं ॥ १७ ॥
लोकक्षयावह भयावह त्या खळानें ॥
मागीतला वर असा चि विशृंखळानें ॥
हांसोनियां शिव तथास्तु असें वदे तो ॥
जाणों सुधा विषधराप्रति देव देतो ॥ १८ ॥
पीती यथेष्ट अमृतासि तथापि नाकी[30] ॥
जाले भयार्त विमना चि तथा पिनाकी[31] ॥
हर्षे सुदुर्मति वृकासुर कामलाभें ॥
नाहीं ह्मणे सुरमृगैकवृकी[32] मला भें[33] ॥ १९ ॥
ऐसा तो पापरूपी वृक असुर बरें वंचुनी लोकराया ॥
योजी तत्काळ चित्तीं समधिगत[34]वराची परीक्षा कराया ॥
केला संकल्प लोकत्रयसुभगा[35]शिवा[36]रत्न त्याचें हराया ॥
धांवे ठेवावया तो स्वकर शिरिं तदा भीति जाली हरा या ॥२०॥

---

२२ प्रपन्न=शरणागत. २३ काम=इच्छा. २४ शिखि=अग्नि. २५ तां=त्वां. २६ सकृत्=एकवार. २७ मागें=पूर्वी. २८ मागें=माग. २९ पंकराशी=पापराशी. ३० नाकी=स्वर्गस्थ (देव). ३१ पिनाकी=शंकर. ३२ सुर-मृगैकवृक=देवरूपी पशूंस लांडग्यासारखा. ३३ भें=भय. ३४ समधिगत=प्राप्त ३५ सुभग=सुंदर. ३६ शिवा=पार्वती.

अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

जाळावा अरि लोचनानळकणें दुष्कीर्ति भक्तक्षयें ॥
देयादेय नसे वदान्य[37] गुरुला श्रीशंभुला निश्चयें ॥
दासापासुनिया पराभव बरा मानूनि ऐसें स्वयें ॥
तो मृत्युंजय मन्मथांतक पळे जाणों तयाच्या भयें ॥ २१ ॥

न सावरति सर्वथा दश भुजा हि देवा जटा ॥
वृषासहित राहिल्या चरण पादुका वाजटा[38] ॥
शिरःस्रजें[39] हि धावतां त्वरित भंग पावे गळे ॥
गळोनि पडलें फणी पथिं भुजंगपा वेगळे ॥ २२ ॥

गळाल्या गळांतूनि रुद्राक्षमाला । नसे निर्भयस्थान रुद्रा क्षमाला ॥
पळे विष्टपीं[40] उघडा नागवा जी । पदाला चि मानी प्रभू नागराजी[41] ॥ २३ ॥

काष्ठांचे[42] नाथ सारे निरखुनि ह्मणती हतमाच्या अहर्पा[43] ॥
बोलावें काय आह्मी अजि अमृत कसें पाजितां दुष्ट सर्पा ॥
ज्यांते देवा वरांतें खळमति धरिती ते महापाप दर्पा ॥
त्याचें कांहीं च नाहीं स्मरण आणि पुन्हा दुर्जनाला चि तर्पा॥२४॥

नाहीं दुष्कीर्ति कांहीं अलिक[44]दृगनळे जाळितां दैत्यटोळा ॥
केला कीं या खळानें सुविमळमहिमा सर्व ही आज गोळा ॥
ध्याना वांचूनि कीं हा न उघडि इलुसा कामदाहोग्र डोळा ॥
या औदार्ये सुरांचें घर बुडवितसे हा महाराज भोळा ॥ २५ ॥

याणें देवूनि पूर्वी प्रवरवर जनीं तर्पिला पंक्तितुंड[45] ॥
तो अंतीं श्रीमदानें निशिचर कुमती माजला फार पुंड ॥
कैलासाच्या चि जाला स्वभुजमळमदें सिद्ध उन्मूलनाला ॥
घाली हस्तासि जैसा समदगजपती पद्मिनी मूळनाला ॥ २६ ॥

हा तैसा चि स्वपादस्तवनतनमनें थेय तत्थेय नाचे ॥
जाला बाणासुरा ही वरद पुरविलें इष्ट त्याच्या मनाचें ॥
पाळावें लागलें तत्पुर मग सुटला स्वीय कैलासवास ॥
सांगावें स्पष्ट कोणी हित अहित असे या जगद्वास खास ॥ २७ ॥

असें देव स्वांतीं वदति मनीं कोपें चि जळती ॥
जयीं भोळेनाथ त्रिनयन महाराज पळती ॥
सुचेनाती युक्ति द्रुत हरिल जी संकट पती ॥

---

३७ वदान्यगुरु=दातृ-श्रेष्ठ. ३८ वाजटा=वाजणाऱ्या. ३९ स्रज=माळ. ४० विष्टप=स्वर्ग. ४१ नाग=हत्ती. ४२ काष्ठा=दिशा. ४३ अहर्प=दिन-नाथ (सूर्य). ४४ अलिक=कपाळ. ४५ पंक्तितुंड=दशमुख (रावण).

अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दिशांचे ते तुष्णी सभयदय साशंक टपती ॥ २८ ॥
निर्भीक[४६]स्थानकामें पुरहर भुवनें हिंडला सर्व आशा ॥
नाहीं संपूर्ण झाली ह्मणउनि निरखी घाबरा सर्व आँशा ॥
श्वेतद्वीपासि गेला मग निगमर्नुते त्र्यक्ष तो भगळा जो ॥
भक्तापासूनि जाला परिभव ह्मणुनी कां महाभाग लाजो ॥ २९ ॥
आला धांवत तूर्ण तेथ हि महा उत्पातकारी वृक ॥
जैसा वारणमारणस्पृह हरी किंवा मृगारी वृक ॥
तो वेगें बटुवेश शेषशयन श्रीकांत ये आडवा ॥
जो दुष्टां यम सज्जनास दसरा दीपावळी पाडवा ॥ ३० ॥
अजिनदंडकमंडलुमेखळा ॥ कुशधर द्विजबाळ गमे खळा ॥
पथि तयाशि करूनि नमो हरी ॥ मधुरवाक्पटु तो मन मोहरी ॥ ३१ ॥
बैसावें शाकुनेया क्षणभरि परमश्रांत जालासि वाटे ॥
कां जालें दूर येणें बहुत लगबगां चालिलां फार वाटे ॥
आत्मा सर्वार्थ दाता सकळबुधमतें पूरुषाला निकामं ॥
साधावें सर्व कांहीं अनुदिन चतुरें यासि रक्षूनि काम ॥ ३२ ॥
आला अत्यंत दूर श्रमउनि तनुला ज्यास्वकार्यानिमित्त ॥
सांगावें हो विभो तें श्रवाणिं जरि मला योग्य मानील चित्त ॥
प्राय:स्वार्थाप्तिसाठीं वरिति निपुणते लोक आप्ता सहाया ॥
बाळाच्या भाषणातें नयपथनिपुणा प्रार्थितों मी सहा या ॥ ३३ ॥
हरा ही वंचाया बहुगति जया पाठकवि तो ॥
असा ही जो कीं त्या प्रभु कपटि भूपा ठकवितो ॥
हरीनें युक्तीनें पथि शाकुनिचा पाक वळिलें[५२] ॥
महापाशा विस्तारुनि कपटरूपा कवळिला ॥ ३४ ॥
पीयूष[५३]वर्षिवचनें परिसोनि कानें ॥ होऊनियां श्रमविवर्जित त्या वृकानें ॥
सांगीतलें सकळ वृत्त बटुप्रतीतें ॥ जो ओपिला वर हरें भुवनप्रतीतें ॥ ३५ ॥
सारें ऐकोनि वृत्त स्मित करुनि ह्मणे दक्षशापें पिसोंची[५४] ॥
जाला वाचा तयाची निजमानें गणितां काय अद्यापि साची ॥
राहे प्रेतीं पिशाचीं गतविभव वसे नित्य नग्न स्मशानीं ॥
त्याचा विश्वास कैसा तुह्मिं दृढ धरिला शाहण्यानीं अशांनीं ॥ ३६ ॥

---

४६ निर्भीक=निर्भय. ४७ आशा=दिशा. ४८ निगमनुत=वेदस्तुत. ४९ तूष्णीं=गप्प–उगीच. ५० निकाम=अत्यंत. ५१ पाक=पुत्र. ५२ वळिला=आडवला. ५३ पीयूष=अमृत. ५४ पिसा=वेडा.

अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

